इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या प्राथमिक /माध्यमिक व उच्च माध्यमिक / विद्यानिकेतन / उसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमध्ये कार्यरत असलेल्या नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात असणाऱ्या आश्रमशाळांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता / एकस्तर पदोन्नतीच्या लाभाबाबत.

महाराष्ट्र शासन

इतर मागास बहुजन कल्याण विभाग

शासन निर्णय क्रमांक- विभशा-२०१९/प्र.क्र.१०४२/विजाभज-२,

१ ला मजला, विस्तार भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई.

दिनांक : १३ मार्च, २०२०.

वाचा- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा, दि.६/८/२००२.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक विभशा-२००६/ प्र.क्र.२५४/ मावक-६, दि.३/१२/२००७.

३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक एसएसएन-१००७/(१६६/०७)/ माशि-२, दि.१४/८/२००८.

प्रस्तावना :-

या विभागामार्फत स्वयंसेवी संस्थांना अनुदान देऊन आश्रमशाळा चालविण्यात येतात. अशा आश्रमशाळांमध्ये कर्मचाऱ्यांची नेमणूक स्वयंसेवी संस्थामार्फत करण्यात येते. तसेच नियुक्त केलेले कर्मचारी नेमणूकीपासून सेवानिवृत्तीपर्यंत त्याच संस्थेच्या आश्रमशाळेमध्ये कार्यरत असतात. ही बाब विचारात घेता विभागाच्या आश्रमशाळांतील कर्मचारी बदलीपात्र नाहीत.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या वाचा येथील दि.३/१२/२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासनाने घोषित केलेले नक्षलग्रस्त क्षेत्र व त्यामधील जिल्ह्यांमधील विमुक्त जाती / भटक्या जमातीच्या मुलांसाठी असलेल्या सर्व आश्रमशाळांतील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता लागू करण्यात आला. तथापि, विभागाच्या आश्रमशाळांतील कर्मचारी हे बदलीपात्र नसल्याने अशा कर्मचाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रोत्साहन भत्ता / एकस्तर पदोन्नतीच्या लाभाचा आढावा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, सामान्य प्रशासन विभाग तसेच वित्त विभागाचे याबाबत अभिप्राय घेण्यात आले असून त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

शालेय शिक्षण विभागाने दि.१४/८/२००८ च्या शासन निर्णयान्वये "शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त/आदिवासी म्हणून घोषित केलेल्या क्षेत्रातील गावे व शहरे येथे काम करण्यासाठी प्रोत्साहन

म्हणून मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळा, कनिष्ठ महाविद्यालये व सैनिकी शाळांतील सर्व संबंधीत बदलीपात्र शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी यांना त्या क्षेत्रात कार्यरत असेपर्यंतच्या काळात वरिष्ठ/पदोन्नतीची वेतनश्रेणी मंजूर केली असून ही एकस्तर पदोन्नती संबंधित शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात कार्यरत असेपर्यंतच अनुज्ञेय राहील व यासाठी कमाल वर्षमर्यादा ६ वर्षे इतकीच असेल व त्यानंतर त्यांची बदली कुठल्याही परिस्थितीत या क्षेत्राबाहेर करावी, त्या क्षेत्रातून शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी बिगर आदिवासी/ नक्षलग्रस्त क्षेत्रात परत आल्यावर तो त्याच्या मूळच्या संवर्गातील वेतनश्रेणीत पूर्वीच्या वेतनाच्या अनुषंगाने वेतन घेईल, मात्र या अधिकारी/कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आलेला आहे त्यांना आणखी वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय नसेल, तसेच जे शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी नियुक्तीपासून निवृत्तीपर्यंत नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात कार्यरत असतील ते एकस्तर पदोन्नतीसाठी पात्र असणार नाहीत” याप्रमाणे तरतुदी केलेल्या आहेत.

२. वित्त विभागाने त्यांचे अभिप्राय देतांना, “(१) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.६/८/२००२ च्या शासन निर्णयान्वये प्रोत्साहन भत्ता व एकस्तर पदोन्नती ही योजना लागू करण्यात आलेली आहे. या योजनेमधील असलेल्या अटी व शर्तीच्या अनुषंगाने शालेय शिक्षण विभागाने सदर योजना लागू केलेली आहे. तथापि सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा दि.३/१२/२००७ चा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अटी व शर्तीनुसार नसल्याने सदर शासन निर्णय रद्द करणेबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास वेगळ्याने कळविण्यात यावे, (२) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.६/८/२००२ च्या शासन निर्णयाचा मूळ हेतू इतर भागातील चांगले व होतकरु अधिकारी/कर्मचारी यांना प्रोत्साहन देऊन नक्षलग्रस्त व आदिवासी भागात काम करण्यास प्रवृत्त करणे हा आहे. सबब बदलीपात्र नसलेल्या विजाभज विभागाच्या आश्रमशाळांमधील कर्मचाऱ्यांना आदिवासी व नक्षलग्रस्त भागाकरीता देय असलेली एकस्तर पदोन्नती/प्रोत्साहन भत्ता लागू करता येणार नाही.” असे अभिप्राय दिलेले आहेत.

३. शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच वित्त विभाग व सामान्य प्रशासन विभागाचे वर नमूद केलेले अभिप्राय विचारात घेऊन या विभागाच्या प्राथमिक /माध्यमिक व उच्च माध्यमिक / विद्यानिकेतन / उसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमध्ये कार्यरत असलेल्या आश्रमशाळांतील कर्मचारी हे बदलीपात्र नसल्याने त्यांना आदिवासी आणि नक्षलग्रस्त भागातील कर्मचाऱ्यांना देय असलेली एकस्तर पदोन्नती / प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय नाही. त्यानुषंगाने योग्य कार्यवाही संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण तसेच सहायक आयुक्त, समाज कल्याण यांनी पुढील ३० दिवसात करावी आणि या विभागाला अहवाल सादर करावा.

४. सदर शासन निर्णय शालेय शिक्षण विभागाचे दि.५/११/२०१९ चे अभिप्राय, सामान्य प्रशासन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१२७१/२०१९/कार्या.१२, दि.४/१२/२०१९ व वित्त विभागाचा

अनौपचारिक संदर्भ क्र. ७२७/२०२०/व्यय-१४, दि.३/१/२०२० अन्वये प्राप्त अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००३१६१२०००९५३२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.03.16 12:03:22 +05'30'

**(भा. र. गावित)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व).
१२.सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व).
१३.जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४.निवड नस्ती (विजाभज-२).